आदिवासी उपयोजनेच्या अंमलबजावणी मध्ये बदल करण्यासाठी गठीत पुनर्विलोकन समितीच्या रचनेमध्ये बदल करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख: २१ ऑगस्ट, २०१४

**वाचा -**

१) आ.वि.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२८.४.२०१४
२) आ.वि.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी २०१३/प्र.क्र.२६४/का.६, दि.२६.६.२०१४
३) आयुक्त, आ.वि, नाशिक यांचे क्र.नियो-२०१४/प्र.क्र./का.५(१), दि.१६.७.२०१४ चे पत्र.
४) आयुक्त, आ.वि, नाशिक यांचे क्र.नियो-२०१४/प्र.क्र./का.५(१), दि.२५.७.२०१४ चे पत्र

**प्रस्तावना -**

आदिवासी उपयोजनेच्या अंमलबजावणीमध्ये बदल करण्यासाठी श्री.पी.डी.करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १४.७.२०१४ रोजी पुनर्विलोकन समितीसोबत झालेल्या बैठकीतील चर्चेनुसार पुनर्विलोकन समितीला कामाच्या दिशेबाबत विविध विषयाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना मा.मंत्री (आदिवासी विकास) तसेच मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांनी दिल्या. आदिवासी उपयोजना पुनर्विलोकन समितीचे कामकाज सुलभ होण्यासाठी आयुक्तालय, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे येथे आहे. त्यामुळे समितीच्या कामाचे नियोजन, सुसूत्रता व समन्वय साधण्यासाठी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना सदस्य सचिव म्हणून नियुक्ती होणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजना पुनर्विलोकन समितीचे कामकाज हे आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे या कार्यालयातून होणार असल्यामुळे समितीच्या कामकाजाचे नियोजन करण्यासाठी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांची सदर समितीवर सदस्य सचिव म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे पुनर्विलोकन समितीचे सदस्य राहतील. समितीने केलेल्या कामाची प्रगती, प्राथमिक व अंतरिम अहवाल किती टप्प्यात व कशा पध्दतीने सादर करण्यात येणार आहे याबाबत सदस्य सचिव यांनी समितीसोबत चर्चा करुन नियोजन करावे.

२. आदिवासी उपयोजना पुनर्विलोकन समितीचे कामकाज सुलभ होण्यासाठी मा.मंत्री (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीतील चर्चेनुसार देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन शासन खालीलप्रमाणे मान्यता देत आहे. समितीच्या कामकाजासाठी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे येथील कार्यालयातील "नियोजन शाखा" हा सनियंत्रण कक्ष राहील. समितीच्या कामाकरिता उपसंचालक, एक्षेविका यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. समितीच्या बैठका व अभ्यास दौरे यांचे नियोजन व व्यवस्था याबाबत नोडल अधिकारी यांनी कार्यवाही करावी. नोडल अधिकारीसमवेत समितीच्या अभ्यासात सहाय्य करण्यासाठी दोन संशोधन सहाय्यकांची आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी मानव शास्त्र / सामाजिक शास्त्र / अर्थशास्त्र या विषयाशी संबंधित संशोधन कामात प्रविण्य असलेल्या उमेदवाराला मानधनावर नियुक्ती करावी. युजीसीने प्रमाणित केलेली रक्कम संशोधन सहाय्यकांना मानधन म्हणून देय राहील. सबळीकरण संस्थेकडे उपलब्ध तरतूदीतून संशोधन सहायकांचे मानधनाची रक्कम अदा करण्यात यावी. समिती सदस्यांचे मानधन, प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, आकस्मिक खर्च यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी आहरित करुन ठेवलेली रु.३०.०० लक्ष एवढी रक्कम आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचेकडे वर्ग करण्यात यावी. मानधन, प्रवासखर्च, कार्यालयीन खर्च, आकस्मिक खर्चाची रक्कम आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी सबळीकरण संस्थेमार्फत अदा करावी. या संदर्भात समन्वयक म्हणून उपसंचालक, एकात्मिक क्षेत्र विकास कार्यक्रम हे काम पाहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१०४९३५२६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naik Suresh D

Digitally signed by Naik Suresh D
DN: CN = Naik Suresh D, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = MTD
Date: 2014.08.21 13:42:16 +05'30'

**(सु. द. नाईक)**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक

४. श्री.पी. डी. करंदीकर, समिती अध्यक्ष, पुणे-४११ ०४५.
५. श्री. कृष्णा वत्स, संयुक्त राष्ट्र विकास कार्यक्रम
६. श्री. आर. के. मुटाटकर, मानसशास्त्र तज्ञ
७. श्री. प्रदिप प्रभु, कष्टकरी संघटना, डहाणू
८. श्री. आनंद कपूर, आदिवासी जीवनाचे अभ्यासक तथा तज्ञ संस्थापक
९. प्रो. जानकी अंधारिया, प्राध्यापक टाटा सामाजिक विज्ञान संस्था
१०. डॉ. विनायक तुमराम, आदिवासी सेवा पुरस्कार विजेता
११. श्री. मधुसुदन साठे, अर्थतज्ञ
१२. श्री. रत्नाकर महाजन, माजी कार्यकारी अध्यक्ष, नियोजन मंडळ, महाराष्ट्र राज्य
१३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१९. महालेखापाल १-२, (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२०. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती (कार्यासन-६)